# मला उडता

# का नाही येत?



रीटा



# मला उडता का नाही येत?

रीटा

**मराठी अनुवाद: स्नेहल**



“मी धावू शकते,” मिन्नी बोली.



“मी खूप उंच उड्या मारू शकते.”



मी झोके घेऊ शकते.

मी असं लटकू शकते.





मी झाडावर चढून
आकाशाला हात लावू
शकते.



पण कोणीतरी मला सांगा ना की,
**“मला उडता का येत नाही?”**

“हम्म! जरा बघू बरं...
थोडं समजून घेऊ दे....
हां, मला माहिती आहे, का?





हे जे काही तू पायात घातलं आहेस ना, बूट.
ते बूट नाही उडू शकत.



ते काढून टाक.
ते काढून टाक.
त्यानंतर अगदी वर
उंच शेंड्यापर्यंत चढून जा.



तुझ्या पायातल्या बुटांशिवाय,
मला खात्री आहे तुला उडता येईल.
अच्छा, टाटा...!"



बिना बुटांची मिन्नी वर चढली.
ती झाडाच्या शेंड्यापर्यंत पोहोचली.





आणि ती म्हणाली,
“मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी..........”

“ओह्ह! असं नाही!
किती गडबड-गोंधळ.
हे काही बरोबर नाही.
सगळं चुकीचं आहे.
पायांनी नाही उडता येत.
गाण्यासोबत उडता येतं.



मी नेहमी गात असते.
मी हळूवार सूरात गाते.
मी उंच सूरात गाते.



परत वरती जा आणि गाणं म्हण.
कारण गाण्यामुळेच तुला उडता येईल.
अच्छा.. टाटा!”



तर मिन्नी पुन्हा वरती गेली.
आणि झाडाच्या उंच टोकावरून गाऊ लागली.



“मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी..........”

धडाSSSSम.......

"नाही. हे काही बरोबर नाही.
तुला दिसत नाही का?
तुला समजत नाही का?
तुला उडायचं असेल तर,
तुझ्या शरीरावर माझ्यासारखेच,
लाल-काळे ठिपके हवेत.



तुझ्यावर लाल ठिपके काढते.
तुझ्यावर काळे ठिपके काढते.
तुझ्या शेपटीवर, तुझ्या डोक्यावर, तुझ्या कानांवर, तुझ्या पाठीवर



आता तुझ्यावर पण आहेत ठिपके.
तू आकाशात तरंगत जाशील.
घाबरायचं काहीच कारण नाही.
कारण ठिपक्यांमुळे तू उडू लागशील.
अच्छा, टाटा...!"





अशाप्रकारे लाल-काळे ठिपके
घेऊन,
मिन्नी शेंड्यापर्यंत चढली.



आणि ती म्हणाली,
“मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी..........”

धडाSSSSम.......



“ओह्ह, नाही, नाही!
नाही, नाही, नाही!
असं नाही उडता येणार.
तुला पिसं असायला हवी.
हां, उडण्यासाठी पिसंच हवी.



मी तुझ्यावर गम लावते.
तो गम सुकण्याआधी
तू त्या पिसांमध्ये लोळ.
मग तुला उडता येईल.
अच्छा टाटा...!”



मिन्नी त्या पिसांमध्ये भरपूर लोळली.
मग ती झाडाच्या शेंड्यापर्यंत चढली.





आणि ती म्हणाली,
“मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी..........”

धडाSSSSम.......



‘‘पायांमुळे नाही.
गाण्यामुळे नाही.
पिसांमुळे तर नाहीच नाही.
यातलं काहीच बरोबर नाही.





आणि त्या काळ्या-लाल ठिपक्यांनी
अगदीच नाही शक्य!
उडायचे असेल तर
तुला हवेत पंख!

आपण तुझ्यासाठी पंख बनवूया.
प्रयत्न एवढा करून बघूया.



आणि तुझे जेव्हा पंख असतील,
तू नक्कीच उडू लागशील.
अच्छा टाटा...!”





तिने स्वतःला लावले पंख
आणि चढून गेली शेंड्यापर्यंत



आणि ती म्हणाली,
“मी उडू शकते,
मी उडू शकते,
मी..........”

“याला काहीच अर्थ नाही.
हरले आता मी.
मला नाही उडता येणार.
मी फक्त झाडांवर चढणार.”





“तुला येईल उडता.
त्या झाडावर चढ
पुन्हा एकदा...”



“ठीक आहे”, मिन्नी म्हणाली.
“पण हा माझा अगदी शेवटचा प्रयत्न.”





आणि ती म्हणाली,
“मी उडू शकते,
मी उडू शकते......



मी... उडू... शकते..."





“अच्छा, टाटा...!”



समाप्त

